अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक-गट `अ` (राजपत्रित) संवर्गातील <u>अधिका-यांच्या बदल्यांबाबत</u>

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
### शासन आदेश क्रमांकः बदली १११५/प्र.क्र. ६९/का-१४२७

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०२ जून, २०१५

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४ (५) मधील तरतूदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) (रुपये १५६००-३९१०० + ग्रेड वेतन रुपये ५४००) या संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिका-यांची सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव | सध्याचे पदनाम व कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.ग.रु.वायाळ, | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, अकोला | श्री. मु. मा. सोनकुसरे, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, चंद्रपूर यांचे जागी. |
| २. | श्री.स.रा.भांगरे, | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, गडचिरोली | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, अहमदनगर या रिक्त पदावर. |
| ३. | श्री.सु.हे.आंग्रेकर, | वरिष्ठ संशोधन अधिकारी, मुख्य कार्यालय, मुंबई | श्री.ज्ञा.व.आंबेकर, विशेष कार्य अधिकारी, तिर्थक्षेत्र विकास कार्यक्रम (शेगांव), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांचे जागी. |

२. बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास तो अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईसाठी पात्र ठरेल.

३. संबंधित कार्यालय प्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्यांच्या पदाचा पदभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून या अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे.

४. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्यावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्यावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिका-यांच्या त्या महिन्याचा वेतन देयकासोबत

कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. तसेच, अद्यावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय व शासनास पाठविण्यात यावी. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखांची राहील.

५. काही अधिकारी बदली आदेशाचे पालन करीत नाहीत. त्यामुळे प्रशासकीय कामकाजात अडथळा उत्पन्न होतो असे निदर्शनास आले आहे. यास्तव याबाबत दिरंगाई झाल्याचे व शासन आदेशाचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधिताविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

६. बदली करण्यात आलेल्या अधिका-यांनी त्यांना कार्यमुक्त केल्याबाबतच्या आणि त्यांनी कार्यभार स्वीकारल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

७. सदरहू शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०६०२१६०४३०००१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( प्रियांका रं.छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपुर,
२) मा.मुख्यमंत्री/मा.मंत्री (नियोजन)/मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
३) सर्व विभागीय आयुक्त, कोकण विभाग, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
४) जिल्हाधिकारी, अकोला, गडचिरोली, चंद्रपूर, अमरावती, अहमदनगर
५) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
६) सर्व सह सचिव/उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
९) सर्व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय,
१०) अवर सचिव (का.१४४४),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, अकोला, गडचिरोली, चंद्रपूर, अमरावती, अहमदनगर.
१४) सर्व संबंधित अधिकारी (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत).
१५) निवड नस्ती.